UP-13

**प्रादेशिक योजना - पुणे**
**मौजे-गहुंजे येथील जमिनींचा**
**म.प्रा. व अधिनियम १९६६ चे कलम २०(३)**
**अन्वये फेरबदल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ३१.०८.२००९

शासन निर्णय क्रमांक-टिपीएस-१८०९/२५३१/प्र.क्र.१९४६/०९/नवि-१३

**शासन निर्णय :-** सोबतची शासकिय सूचना महाराष्ट्र शासन राजपत्रामध्ये प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(वि.म. रानडे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
(त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तुत सूचनेच्या वर्तमानपत्रातील जाहिरातीचे देयक कृपया आपण अदा करावे.)
जिल्हाधिकारी, पुणे.
उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे.
(यांना विनंती कि मंजूरीच्या अनुषंगाने अधिप्रमाणीत करावयाचे भाग नकाशे ५ प्रतीत पाठविण्यात यावेत)
व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय सूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिध्द करून त्याच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास, संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे व उप संचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे , सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांना द्यावी)

कृपया मागे पहा...

सहायक संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

(त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तूत सूचना जाहीरात म्हणून कृपया प्रसिध्द करण्यात यावी व प्रस्तुत सूचना कोणत्या दिनांकास प्रसिध्द करण्यात आली आहे, त्याबाबतची माहिती संबंधीत वर्तमान पत्राच्या प्रतीसह शासन, संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे व उप संचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे , सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांना द्यावी, प्रसिध्दीबाबतच्या सूचना खालीलप्रमाणे आहेत.)

| | | |
|---|---|---|
| १.जाहीरात देण्या-या कार्यालयाचे नांव | - | नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ |
| २.जाहीरात कोणत्या दिनांकापर्यंत द्यावयाची आहे | - | तात्काळ |
| ३.प्रसिध्दीचे स्वरुप | - | सर्वाधिक खपाच्या स्थानिक वृत्तपत्रात |
| ४.कोणत्या जिल्हयात | - | पुणे |
| ५.किती वृत्तपत्रात | - | एका इंग्रजी व एका मराठी वृत्तपत्रात |
| ६.वृत्तपत्राचे नांव | - | सर्वाधिक खपाच्या स्थानिक वृत्तपत्रात |
| ७.कितीवेळा | - | एकदा |
| ८.जाहीरात खर्चाचे देयक कोणत्या-अधिका-याकडे पाठवावयाचे | | संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे |

कक्ष अधिकारी (नवि-२९) न,वि,वि, मंत्रालय, मुंबई यांना विनंती की सदरची सुचना या विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करणेत यावी.

निवड नस्ती(नवि-१३)

**NOTICE**

Government of Maharashtra
Urban Development Department,
Mantralaya, Mumbai 400 032
Date:- 31.08.2009
No.TPS-1809/2531/C.R.1946/09/UD-13

Maharashtra Regional & Town Planning Act 1966.

Whereas, the Government in Urban Development Department vide its Notification No. TPS-1895/227/CR-26/95/UD-13, dated 15th November 1997 has sanctioned the Regional Plan for Pune district (herein after referred to as "the said Regional Plan") under Section15 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (hereinafter referred to as "the said Act") so as to come into force with effect from 10th February 1998;

And whereas, as per the proposal of the said Regional Plan, the land between south side Pavana River, North side Mumbai Pune Expressway, East side Pimpri Chichwad Municipal Corporation Limit, West side Gahunge Village, Mauje Gahunje, Tal. Maval (hereinafter referred to as the said land) are included in "Aggricultural & No Development Zone" (hereinafter referred to as the "the said zone") & affected by North-South proposed 90 mt. wide road, East-West proposed 90 mt. wide road;

And whereas, Architect Yeshwant Datar & Associates has requested Government to change the Zone of the said lands and include it in "Residential Zone";

And whereas, after consultation with the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, Government is of the opinion that it is necessary to change the zone specifically shown on part plan and to modify the said Regional Plan as per provisions of Section 20(2) of the said Act, proposed modification as follows-

(1) The land bearing S.No.205(p), 221(p), 225(p) to 231(p), 232, 233(p) to 238(p), 239 to 241, 242(p), 243, 244(p) to 248(p), 249, 251(p) to 256(p), 358(p) to 360(p) etc. of Gahunje specifically shown on part plan are proposed to be deleted from Aggricultural & No Developed Zone & included in residential Zone. The remaining land between Red line (as shown by Irrigation Dept.) to River bond is proposed to be included in Green Zone as shown on plan.
(2) 90 mt. East-West R.P. Road deleted & existing Expressway shown on R.P. as developed on site.
(3) 12 mt.wide proposed road shown on Pimpri Chichwad Municipal Corporation Limit is increased up to 18 mt. wide in Regional Plan area & join to East-West existing road at north end & increase the

width of existing road up to 18 mt. as shown on plan.

(4) All the required infrastructure facilities shall be provided by the developer at his own cost.

(5) The Amenity Space open space & roads shall be developed by land owner as per notice dt.28th August, 2008 published by Government.

(6) Applicant shall produce certificate about adequate water availability from Government/Local Self Government Authority before final sanction.

(7) The condition mentioned in letter dt.31st July, 2009 of Irrigation Department are binding.

(hereinafter referred to as the said modification)

Now, therefore, as provided in sub-section (3) of Section 20 of the said Act, Government hereby declares its intention about the said proposed modification and for that purpose invites suggestions/objections, if any, from general public with respect to the said modification within 30 (Thirty) days from the date of publication of this Notice in Maharashtra Government Gazette. The suggestions or objections, if any, in this respect shall be submitted to the Assistant Director of Town Planning, Pune Branch, 283, Narayan Peth, Pune-411030 who is hereby appointed as an Officer for giving hearing to the persons who have raised the suggestions/objections received and to submit his report to Government.

Suggestions/objections received by the Authorised Officer within the period of 30 (Thirty) days from the date of publication of this Notice in Maharashtra Government Gazette only will be considered.

**Note–**

(A) The part plan showing the said modification bearing No.TPS-1809/2531/C.R.1946/09/UD-13, is kept open for inspection of the public during office hours on all working days at the following offices–

1) Assistant Director of Town Planning, Pune Branch, Pune, 283, Narayan Peth, Pune-411030.
2) The Collector of Pune.

(B) This notification is also published on Government web site at www.urban.maharashtra.gov.in

By order and in the name of the Governor of Maharashtra.

VRanade

(V.M. Ranade)
Under Secretary to Government

# सूचना

## महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## मंत्रालय, मुंबई - ४०००३२
## दिनांक : ३१.०८.२००९

क्रमांक-टिपीएस-१८०९/२५३१/प्र.क्र.१९४६/०९/नवि-१३

महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६

ज्याअर्थी, पुणे जिल्हयाची प्रादेशिक योजना (यापुढे जिचा उल्लेख उक्त प्रादेशिक योजना असा करण्यात आला आहे) महाराष्ट्र शासनाच्या नगर विकास विभागाकडील अधिसूचना क्रमांक टीपीएस-१८९५/२२७/प्र.क्र.२६/ ९५/नवि-१३, दिनांक २५ नोव्हेंबर १९९७ अन्वये (यापुढे जिचा उल्लेख उक्त अधिसूचना असा करण्यात आला आहे) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ (यापुढे ज्याचा उल्लेख उक्त अधिनियम असा करण्यात आला आहे) मंजूर केली असून ती दिनांक १० फेब्रुवारी १९९८पासून अंमलात आली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त प्रादेशिक योजनेच्या प्रस्तावानुसार दक्षिण बाजूकडे पवाना नदी, उत्तरेकडे मुंबई-पुणा द्रुतगती मार्ग पूर्वेकडे पिंपरी चिंचवड महानगरपालिका हद्द, पश्चिमेकडे गहुंजे गाव यामधील क्षेत्र मौ.गहुंजे ता.मावळ (यापूढे ज्याचा उल्लेख उक्त जमिनी असा केला आहे) हया जमीनी शेती तथा नाविकास विभागात समाविष्ट असून (यापुढे ज्याचा उल्लेख उक्त विभाग असा करणेत आला आहे) उत्तर दक्षिण प्रस्तावित ९० मी. रुंद रस्ता आणि पुर्व-पश्चिम प्रस्तावित ९० मी. रुंद रस्त्याचे प्रस्तावाने बाधीत आहे;

आणि ज्याअर्थी, अर्जदार वास्तुविशारद यशवंत दातार आणि असो. यांनी उक्त जमिनी शेती तथा ना विकास विभागातून" वगळून "रहिवास विभागात" समाविष्ट करण्याची विनंती शासनास केली आहे;

आणि ज्याअर्थी संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेशी विचारविनिमय करुन उक्त क्षेत्र भाग नकाशामध्ये दर्शविलेप्रमाणे फेरबदल करणे आवश्यक आहे, असे शासनाचे मत आहे. आणि त्याकरीता उक्त जमिनी उक्त अधिनियमाच्या कलम २०(२) मधील तरतुदीनुसार खालील प्रमाणे फेरबदल करण्याकरिता उक्त प्रादेशिक योजना सुधारित करणे आवश्यक आहे;

१) स.नं.२०५(पै), २२१(पै), २२५(पै) ते २३१(पै), २३२, २३३(पै) ते २३८(पै), २३९ ते २४१, २४२(पै), २४३, २४४(पै), ते २४८(पै), २४९, २५१(पै) ते २५६(पै), ३५८(पै) ते ३६०(पै) वगैरे मौजे गहूंजे भाग नकाशावर स्पष्ट पणे दर्शविलेले क्षेत्र शेती तथा ना विकास विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणे आणि पाटबंधारे विभागाने दर्शविलेले Red Line पासून नदीपर्यंत चे क्षेत्र हरित विभागात समाविष्ट करणेचे प्रस्तावित आहे.

२) ९० मी. पुर्व-पश्चिम प्रादेशिक योजना रस्ता वगळुन अस्तीत्वातील एक्सप्रेसवे नुसारचा रस्ता प्रादेशिक योजनेच्या नकाशावर दर्शविणेत यावा.

३) पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या हद्दीलगत दर्शविलेला प्रस्तावित १२ मी. विकास योजनेचा रस्ता १८ मी. रुंदीचा दर्शवून तो प्रादेशिक योजनेच्या क्षेत्रामध्ये वाढविणेत यावा आणि तो उत्तरेकडून अस्तित्वातील पुर्व-पश्चिम

रस्त्यास जोडून अस्तित्वातील रस्त्याची रुंदी १८ मी. करणेत यावी.

४) प्रश्नाधीन जमिनींकरीता आवश्यक असणा-या सर्व पायाभूत सुविधा मिळकतधारक स्वखर्चाने उपलब्ध करुन देतील.

५) जागेच्या रेखांकनातील १०% खुल्या जागेव्यतिरिक्त सुविधा क्षेत्र, तसेच रस्ते (शासनाने दि.२८.०८.२००८ रोजी प्रसिध्द केलेल्या सुचनेनुसार) दर्शविणे आवश्यक राहील.

६) सदर क्षेत्रासाठी आवश्यक असलेले पाणी उपलब्ध करुन देणेत येईल असा दाखला शासकीय स्थानिक नियोजन प्राधिकरण यांचेकडून अंतीम अधिसुचेनूपूर्वी सादर करणे आवश्यक राहील.

७) जलसंपदा विभाग पुणे यांनी दि.३१ जुलै २००९ चे पत्रात नमुद केलेल्या अटी बंधनकारक राहतील.

(यापुढे ज्याचा उल्लेख उक्त फेरबदल असा करणेत आला आहे)

त्याअर्थी, आता उक्त अधिनियमाच्या कलम २०, पोट-कलम (३) मधील तरतुदीप्रमाणे उक्त प्रादेशिक योजनेत उक्त फेरबदल करण्याचा हेतू शासन याद्वारे घोषित करीत आहे आणि त्याकरिता उक्त फेदबदलाच्या अनुषंगाने, काही सूचना आणि हरकती द्यावयाच्या असतील तर त्या नागरिकांनी सदर सूचना महाराष्ट्र राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० (तीस) दिवसांचे आत सहायक संचालक, नगर रचना, पुणे शाखा, पुणे २८३, नारायण पेठ, पुणे-४११०३० यांचे नांवे लेखी स्वरुपात कारणांसह पाठवाव्यात, प्राप्त होणा-या सूचना/हरकतींवर संबंधितांना सुनावणी देण्याकरिता व त्यावरील अहवाल सादर करण्याकरिता सहायक संचालक, नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे;

ही नोटीस महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३०(तीस) दिवसांचे आत प्राधिकृत अधिकारी यांचेकडे आलेल्या सूचना/हरकतींचाच शासनाकडून विचार केला जाईल.

टीप-

(अ) उक्त फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा-टिपीएस-१८०९/२५३१/प्र.क्र.१९४६/०९/नवि-१३, नागरिकांच्या अवलोकनार्थ कामकाजाचे दिवशी कार्यालयीन वेळेत खालील कार्यालयात उपलब्ध राहील.

२) सहायक संचालक, नगर रचना, पुणे शाखा, पुणे, २८३, नारायण पेठ, पुणे-४११ ०३०.

२) जिल्हाधिकारी, पुणे.

(ब) सदर सूचना शासनाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्याल आली आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वि. म. रानडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.